**वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजनेचा सन २०१५-१६ करिता चालू बाब प्रस्ताव. (४४०६-००५३).**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१५/प्र.क्र.२१५/फ-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २१ जुलै, २०१५.

<u>वाचा</u> :-

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनिमय, दि .१५.५.२००९.
२) अपर प्रधान मुख्य वनसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.९८/(१५-१६)/२७८. दिनांक २५ मे, २०१५.
३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अंर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि. १७ एप्रिल, २०१५.
४) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ३.६.२०१५.
५) अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/ चाबाप्र/प्र.क्र.९८/(१५-१६)/६३५. दिनांक ६ जुलै, २०१५.

**<u>प्रस्तावना :</u>**

अमरावती वनवृत्तातील सर्व्हेक्षण जमाबंदी व वनांचे सिमांकन अंतर्गत चेन फेंसिंग करण्यासाठी तसेच औरंगाबाद वनवृत्तात संरक्षण भिंतीचे बांधकाम करण्याकरिता राज्य योजनेअंतर्गत सन २०१५-१६ करीता वनांचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन यासंदर्भात उपशिर्ष (४४०६-००५३) योजनांतर्गत रु. ५३१.७४ लक्ष रकमेचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून संदर्भांकित क्र. ५ च्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे.

**शासन निर्णय :**

या शासन निर्णयाद्वारे सन २०१५-१६ करीता राखीव वनाचे वनहद्दीचे सर्व्हेक्षण जमाबंदी व सिमांकन या योजनेअंतर्गत चेन फेंसिंग करण्याच्या प्रयोजनासाठी अर्थसंकल्पित तरतुदीच्या मर्यादेत, राहून तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध होणाऱ्या मासिक निधी प्रवाहानुसार अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक यांना अमरावती वनवृत्तासाठी रु. १९.५६ लक्ष निधी वितरित करण्याचे प्रस्तावित आहे.

संदर्भ क्र.३ च्या शासन परिपत्रकानुसार वित्त विभागाने प्रथम आठ महिन्याकरिता (एप्रिल ते नोव्हेंबर) अर्थसंकल्पित निधीच्या ७० % निधी वाटप करण्यास मंजुरी दिली आहे. सबब, अर्थसंकल्पित निधी रु.१०५०.०० लक्ष च्या ७० % रु. ७३५.०० लक्ष निधी पैकी संदर्भ क्र. ४ अन्वये रु. २३२.९२ लक्ष निधी वितरीत करण्यात आले असून आता अमरावती वनवृत्तांतर्गत पश्चिम मेळघाट वन विभागातील धारणी शहरात असलेल्या वन जमिनीचे संरक्षणाकरिता त्याभोवती चेन लिंक फेंसिंग करण्यासाठी **रुपये १९.५६ लक्ष** (०२ मजूरी - रु. ४५,५७५/-, २७ लहान बांधकामे - रु. १९,५६०/-, ५३ मोठे बांधकामे रु. १८,९०,८६५/-) इतका निधी पुढील अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा.

२) यामध्ये कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची पुरेपूर दक्षता घेण्यात यावी.

३) वित्त विभागाने दिनांक ११/७/२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.

४) सदर मान्यता ही सन २०१५-१६ या कालावधी करिताच देण्यात येत आहे.

५) सदर योजनेस प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याची खात्री करावी.

सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च राज्य योजनांतर्गत योजना वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (४४०६-००५३) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०१५-१६ मध्ये मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा. निधी खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच इतर बाबतीत दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक विअप्र-१००८/प्र.क्र७०/२००८/ विनियम, दिनांक १५/५/२००९ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७(२) अ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२११७४५२७७९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.07.21 17:47:49 +05'30'

**( वीरेंद्र तिवारी )**

मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर

४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती.

५) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.

६) वनसंरक्षक (भूमी अभिलेख), पनवेल / नागपूर.

७) उप वनसंरक्षक, पश्चिम मेळघाट, परतवाडा.

८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

९) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

१०) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

११) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१२) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१३) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.